एका प्रकारच्या रजेचे दुस-या प्रकारच्या रजेत परिवर्तन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
परिपत्रक क्रमांक-एलव्हीई-२४८१/सीआर-१३६२/एसईआर-९,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ फेब्रुवारी १९८२.

## परिपत्रक

शासकीय कर्मचा-याला आधी मंजूर झालेली रजा, ती मंजूर करण्यांत आली त्यावेळी, त्याला देय व अनुज्ञेय असलेल्या वेगळ्या प्रकारच्या रजेत, त्याच्या विनंतीनुसार, पूर्वलक्षी प्रभावाने परिवर्तित करण्याचा अधिकार महाराष्ट्र नागरी सेवा [रजा] नियम, १९८१ च्या नियम १४ अन्वये सक्षम प्राधिका-याला दिलेला आहे. सक्षम प्राधिकारी, ही विनंती शासकीय कर्मचारी फक्त सेवेमध्ये असतानाच मान्य करू शकतो. नियत वयमानानुसार किंवा अन्यथा शासकीय कर्मचारी निवृत्त झाल्यावर, सक्षम प्राधिकारी अशी विनंती मान्य करू शकत नाही. ही बाब महाराष्ट्र नागरी सेवा [रजा] नियम, १९८१ मधील नियम २२ व ६७ यांतील तरतुदीनुसार असून त्या नियमाप्रमाणे जेव्हा एखाद्या शासकीय कर्मचा-याची सेवा समाप्त होते, तेव्हा त्याच्या खाती असलेली सर्व प्रकारची रजा व्यपगत होते. म्हणून शासन असा खुलासा करीत आहे की, संबंधित शासकीय कर्मचा-याची सेवा समाप्त झाल्यावर, महाराष्ट्र नागरी सेवा [रजा] नियम, १९८१ मधील नियम १४ अनुसार सक्षम प्राधिका-यानी त्यांना दिलेल्या अधिकाराचा वापर करता कामा नये. कारण तसे करणे नियमबाहय असून सांविधिक नियमांच्या तरतुदीचे उल्लंघन करणारे आहे. या परिपत्रकाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

अ. कृ. गोलतकर
शासनाचे सहाय्यक सचिव.

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई [१६० प्रती],
महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर [४० प्रती],
महालेखापाल, [वैज्ञानिक व वाणिज्य], मुंबई [४० प्रती],
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
× सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
× सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
× प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य उच्च न्यायालय, मुंबई,
× प्रबंधक, लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालये, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,

कृ. मा. प.

मंत्री व राज्यमंत्री व उपमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
विभागीय आयुक्त, मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर/नाशिक/अमरावती,
मंत्रालयीन सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीनस्त असलेल्या सर्व विभागांचे
व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र राज्य, नवी दिल्ली,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने.

× पत्राने.

---

<u>Commutation of one kind of leave into a different kind of leave.</u>

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Finance Department.
Circular No. LVE 2481/CR-1362/SER-9.
Mantralaya, Bombay-400 032, Dated 19th February 1982.

## CIRCULAR

Rule 14 of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 empowers the competent authority at the request of the Government servant to commute retrospectively the leave already sanctioned into leave of a different kind which was due and admissible to him at the time the leave was granted. This request can be considered by the competent authority only during the tenure of his service and not after his retirement from service either on superannuation or otherwise. This is in accordance with the provisions contained under Rules 22 and 67 of the Maharashtra Civil Services (Leave) Rules, 1981 according to which all leave standing to the credit of a Government servant lapses as soon as he ceases to be in Government service. Government is therefore, pleased to clarify that the powers vested in the competent authorities under Rule 14 of the Maharashtra Civil Services(Leave)Rules, 1981 should <u>not</u> be exercised by them after the employee concerned has ceased to be in service as it is irregular and violative of the provisions of the statutory rules.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A.K. GOLATKAR,
Assistant Secretary to Government.

---

H-1361(8,000+5-3-82)-a.